**मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा- २ अंतर्गत आशियाई विकास बँकेच्या अर्थसहाय्यित प्रकल्पांसाठी कर्जास शासन मान्यतेबाबत ...**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** मुग्रायो-२०२४/प्र.क्र.२९०/बांधकाम-४
५ वा मजला, बांधकाम भवन, २५ मर्झबान पथ,
फोर्ट, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१
तारीख: १२ जुलै २०२४.

वाचा :

१) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** ग्रासयो-२०१५/प्र.क्र.१२/योजना-९, दिनांक २८.१०.२०१५.
२) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०२१/प्र.क्र.१६५/बांध-४, दिनांक ०६.०१.२०२२.
३) **शासन निर्णय, ग्राम विकास विभाग क्रमांकः** मुग्रायो-२०१९/प्र.क्र.२२७(अ)/बांध-४, दिनांक ०८.०३.२०१९.
४) **मा. मंत्रीमंडळाच्या दि. २६.०६.२०२४ रोजीची बैठक**

प्रस्तावना :

राज्यातील इतर जिल्हा मार्ग व ग्रामीण मार्ग यांची एकुण लांबी व त्याप्रमाणात दर्जोन्नती झालेल्या रस्त्यांची लांबी कमी प्रमाणात असल्याने,महाराष्ट्र शासनाने उपरोक्त वाचा क्र.१ मधील दिनांक २८ ऑक्टोबर, २०१५ रोजीच्या शासन निर्णयान्वये, प्रधानमंत्री ग्राम सडक योजनेच्या धर्तीवर मुख्यमंत्री ग्राम सडक योजना सुरू केली होती. सदर योजनेच्या टप्पा-१ मध्ये सन २०१५-१६ ते २०१९-२० या कालावधीत दर्जोन्नतीसाठी एकुण ३०,००० कि.मी. लांबीचे रस्ते व नवीन जोडणीमध्ये एकुण १११ कि.मी. लांबीचे रस्ते मंजुर करण्यात आले होते.यापैकी सद्यस्थितीत सुमारे २८४३२ कि.मी. लांबीचे रस्ते पूर्ण करण्यात आले असून, उर्वरित लांबी सन २०२४-२५ अखेर पूर्ण होणार आहे.

**०२.** मुख्यमंत्री ग्राम सडक योजनेंतर्गत सन २०१९-२० या वर्षातील उद्दिष्टातील साधारणपणे ६३०० कि.मी. लांबीच्या कामांकरीता आशियाई विकास बँकेकडून एकुण ५०० मिलीयन यु.एस. डॉलर कर्ज घेण्यास दि.०८ मार्च २०१९ रोजीच्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली होती. सदरचे कर्ज हे प्रतिपूर्ती स्वरूपाचे असून त्यांचेकडून प्राप्त होणाऱ्या ५०० मिलीयन यु.एस. डॉलरच्या कर्जाची, २०० मिलीयन यु.एस. डॉलर [ Loan ID- ३८०५ (Batch-१) ] व ३०० मिलीयन यु.एस. डॉलर [ Loan ID- ४०९७ (Batch-२ ) ]अशा २ टप्प्यात कर्ज

घेण्यात आले होते. सदरहू कर्जातून अनुक्रमे लोन क्र.३८०५ (बॅच क्र.१ ) २५ मिलीयन यु.एस.डॉलर व लोन क्र.४०९७ (बॅच क्र.२) अंतर्गत ४७ मिलीयन यु.एस.डॉलर बचत होत आहे.

०३. मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ ही योजना दिनांक ६ जानेवारी, २०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये राबविण्यात येत आहे. सदर योजनेंतर्गत रस्ते दर्जोन्नतीसाठी १०,००० कि.मी . इतक्या लांबीचे उद्दिष्ट ठरवण्यात आले आहे. सदर उद्दिष्टापैकी नियमित ७००० कि.मी. लांबीचे रस्ते जिल्हानिहाय वाटप करण्यात आलेले आहेत व ३०% लांबी संशोधन व विकास अंतर्गत मंजुर करण्यात आली आहे.प्रस्तुत उद्दिष्टांनुसार १०,००० कि.मी.लांबीच्या दर्जोन्नतीची कामे प्रगतीपथावर आहेत.

०४. मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा- २ अंतर्गत आशियाई विकास बँकेकडून ३१० मिलियन युएस डॉलर कर्जाबाबतचा प्रारंभिक प्रकल्प अहवाल (Preliminary Project Report PRRID ११९४१) वित्त विभागामार्फत केंद्र शासनास दि.०२.१२.२०२२ रोजी सादर करण्यात आला होता.त्यानुषंगाने केंद्र शासनाच्या आर्थिक कार्य विभागाच्या दि.२९.०३.२०२३ रोजीच्या १३८ व्या Screening Committee च्या बैठकी दरम्यान संमती देण्यात आली होती,तदनंतर सदर प्रस्ताव दि.२५.०४.२०२३ रोजी आशियाई विकास बँकेस मंजुरीस्तव (Posing of Proposal )सादर करण्यात आला आहे.

०५. मुख्यमंत्री ग्रामसडक योजनेसाठी आशियाई विकास बँकेकडून लोन क्र.३८०५ (बॅच क्र.१ ) २५ मिलीयन यु.एस.डॉलर व लोन क्र.४०९७ (बॅच क्र.२) अंतर्गत ४७ मिलीयन यु.एस.डॉलर बचत विनियोगाबाबत व मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ अंतर्गत मंजुर कामांसाठी आशियाई विकास बँकेकडून अर्थसहाय्य प्राप्त होण्यासाठी दि. २६.०६.२०२४ रोजी पार पडलेल्या राज्य मंत्रीमंडळाच्या बैठकीत चर्चा होऊन पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात आला आहे.

## शासन निर्णय:

०१. मुख्यमंत्री ग्रामसडक योजना टप्पा-२ साठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील आशियाई विकास बँकेच्या अर्थसहाय्याने २९९ पॅकेज अंतर्गत ७०५ कामे ३९०९ कि.मी. लांबीची व रू. ३४८० कोटी इतक्या रकमेच्या प्रकल्पांना दर्जोन्नती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०२. मुख्यमंत्री ग्राम सडक योजना टप्पा-२ साठी सन २०२४-२५ या आर्थिक वर्षातील आशियाई विकास बँकेच्या अर्थसहाय्यित कामांना आशियाई विकास बँकेचे ३१० मिलियन यु.एस.डॉलरचे ( PPR ११९४१ प्रमाणे ) ५ वर्षाच्या ग्रेस पिरियडसह २५ वर्षात परतफेड कालावधीसह कर्ज घेण्यास मान्यता देण्यात येत आहे .

०३. सदरचे कर्ज आशियाई विकास बँकेच्या धोरणानुसार हे RBL ( Result Based Lending ) या स्वरूपात वितरित करण्यात येणार असून त्यासंबंधी आवश्यक DLI (Disbursement Link Indicators) वित्त विभागाच्या सहमतीने अंतिम करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०४. आशियाई विकास बँकेकडून प्राप्त होणारे कर्ज प्रतिपुर्ति स्वरूपाचे असल्याने मुद्दल आणि कर्जाच्या व्याजाच्या परतफेडीसाठी राज्य अर्थसंकल्पात आवश्यकतेनुसार तरतूद करण्यास

मान्यता दर्शविण्यात येत आहे. तथापि सदरचे कर्जावरील व्याज हे SOFR RATE आधारित असल्याने त्यानुसार तरतूद अर्थसंकल्पात करण्यात येईल.

०५. आशियाई विकास बैंकेकडून उपलब्ध होणाऱ्या ३१० मिलियन यु.एस. डॉलरची ( PPR ११९४१ प्रमाणे) कामे Advance Contracting द्वारे करण्यास आशियाई विकास बैंकेकडून प्राप्त होणा-या मान्यतेनुसार पुढील कार्यवाही करण्यास मान्यता दर्शविण्यात येत आहे.

०६. मुख्यमंत्री ग्रामसकडक योजनेंतर्गत आशियाई विकास बँक अर्थसहाय्यित लोन क्र.३८०५ (बॅच क्र.१ ) २५ मिलीयन यु.एस.डॉलर व लोन क्र.४०९७ (बॅच क्र.२) अंतर्गत ४७ मिलीयन यु.एस.डॉलर बचतीच्या विनियोगाबाबत केंद्र शासनाच्या आर्थिक व्यवहार मंत्रालय तसेच आशियाई विकास बँकेच्या सहमतीने कार्यवाही करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

०७. आशियाई विकास बँकेकडून अर्थसहाय्य प्राप्त होईपर्यंत प्रगतीप्रथावरील कामांच्या खर्चाकरिता राज्य नियतव्ययातील आशियाई विकास बँकेच्या लेखाशिर्षातून खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०७१२१४४८३८६०२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.07.12 16:56:07 +05'30'

**(प्रशांत पाटील)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. मुख्यमंत्री महाराष्ट्र राज्य, यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
२. मा. उप मुख्यमंत्री (गृह) महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री ( वित्त व नियोजन )महाराष्ट्र राज्य, यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विधानसभा सदस्य, मा.विधानपरिषद, सदस्य.
६. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
७. महालेखापाल (लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
८. विभागीय आयुक्त, महसूल विभाग, सर्व.
९. प्रधान सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन, मुंबई *(पत्राने).
१०.मुख्य अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

११.जिल्हाधिकारी,सर्व.

१२.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,सर्व.

१३.मा.मंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१४.मा.राज्यमंत्री (ग्रा.वि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

१५.अधीक्षक अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व विभाग.

१६. कार्यकारी अभियंता (प्र.मं.ग्रा.स.यो.), महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, सर्व जिल्हे.

१७.मा.प्र.स. (ग्रा.वि. व पं.रा.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१८.सचिव, (मु.मं.ग्रा.स.यो.), ग्राम विकास विभाग, यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.

१९.मंत्रालयीन विभाग, सर्व.

२०.सह सचिव/उप सचिव सर्व, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. सर्व कार्यासने, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

२२.निवड नस्ती (कार्यासन बांधकाम-४) ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.